**औद्योगिक न्यायालय,महाराष्ट्र, मुंबई या कार्यालयातील कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः औन्यामुं-१०२०/प्र.क्र.४७/काम-६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: **३० नोव्हेंबर, २०२१**

संदर्भ: १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६ब, दि.२१/१२/२०१९.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७अे /१६ब, दि.३०/०६/२०२०.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८ /१६ब, दि.२७/११/२०२०.
४) शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र.औन्यामुं-१०२०/प्र.क्र.४७/ काम-६, दि.११/०१/२०२१.
५) प्रबंधक,औद्योगिक न्यायालय,महाराष्ट्र,मुंबई यांचे पत्र क्र.औन्यामुं/आस्था-१/ १९५५/२०२१, दि.३०/१०/२०२१.

प्रस्तावना:-

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ डिसेंबर, २०१९ मधील तरतुदीनुसार, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या संख्येइतकी, असे अधिकारी व कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत असतील त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत तसेच उपरोक्त नमूद सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयापूर्वी, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवामुक्त करण्यात आलेले अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा समाप्ती पूर्वी ते ज्या पदावर कार्यरत होते, त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांना मानतावादी दृष्टीकोनातून व प्रशासनाची होणारी अडचण दूर करण्यासाठी सर्व प्रशासकीय विभागांनी तात्पुरत्या स्वरुपात अकरा महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यन्त अधिसंख्य पदावर नेमणूक देणेबाबत निर्देश देण्यात आले आहे.

तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.३० जून,२०२० अन्वये सदर अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे प्राधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दि.११ जानेवारी, २०२१ अन्वये श्रीमती पी.पी.पराते, स्वीय सहाय्यक, श्रीमती एस.एस.मयेकर, न्यायालय लिपिक, श्री.एस.बी.पराते, न्यायालय लिपिक श्री.पी.एन जंगले,

न्यायालय लिपिक व श्री.आर.के.कांबळे, बेलिफ यांच्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली. उपरोक्त कर्मचाऱ्यांच्या सेवा दिनांक २७/११/२०२० पासून औद्यागिक न्यायालय, महाराष्ट्र, मुंबई यांच्या अंतर्गत ११ महिन्यांसाठी अधिसंख्य पदांवर वर्ग करण्यात आल्या आहेत. सदरहू कर्मचाऱ्यांची अधिसंख्य पदावर सेवा वर्ग केल्याची मुदत दि.२६/१०/२०२१ रोजी समाप्त झाली असल्याने, त्यांना दि.२७/१०/२०२१ पासून पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

आता या शासन निर्णयान्वये खालील नमूद तक्यातील कर्मचाऱ्यांना तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा सदर कर्मचारी सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यन्त किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यन्त यापैकी जे आधी घडेल तोपर्यन्त मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | अधिसंख्य पदावर सेवा सेवा वर्ग करण्यात आल्याचे औ.न्या.महाराष्ट्र, मुंबई यांचे आदेश क्रमांक व दिनांक | नियुक्तीस ११ महिने मुदत पूर्ण होत असल्याचा दिनांक | नियुक्तीस पुढील ११ महिन्यांसाठी खालील दिनांकापासून मुदतवाढ |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती पी.पी.पराते, स्वीय सहाय्यक, औद्योगिक न्यायालय,सातारा | आदेश क्र.७७२, दि.२७/११/२०२० | २६/१०/२०२१ | २७/१०/२०२१ |
| २ | श्रीमती एस.एस.मयेकर, न्यायालय लिपिक, औद्योगिक न्यायालय,मुंबई | आदेश क्र.७६९, दि.२७/११/२०२० | २६/१०/२०२१ | २७/१०/२०२१ |
| ३ | श्री.एस.बी.पराते, न्यायालय लिपिक, कामगार न्यायालय,नागपूर | आदेश क्र.७७१, दि.२७/११/२०२० | २६/१०/२०२१ | २७/१०/२०२१ |
| ४ | श्री.पी.एन.जंगले, न्यायालय लिपिक, कामगार न्यायालय, नागपूर | आदेश क्र.७७०, दि.२७/११/२०२० | २६/१०/२०२१ | २७/१०/२०२१ |
| ५ | श्री.आर.के.कांबळे, बेलिफ, कामगार न्यायालय, सोलापूर | आदेश क्र.७७३, दि.२७/११/२०२० | २६/१०/२०२१ | २७/१०/२०२१ |

२. उपरोक्त कर्मचारी हे सद्य:स्थितीत अध्यक्ष, औद्यागिक न्यायालय, महाराष्ट्र, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असल्याने त्यांच्या वेतनावर होणार खर्च त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधित लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७ नोव्हेंबर, २०२० नुसार प्राप्त प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२१११२९१६४६०६३८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAGUNA GANESH THENGIL

Digitally signed by SAGUNA GANESH THENGIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d46fe3bd37ed57f0bdb52fb3a029adc135025943cb93cc90de6ceb564ced5ea3, pseudonym=E1C179DBCBC6C6E9A930E278944519A63E3712DA, serialNumber=8B4022592C04665617981351F8579C9ABD8539AE93768B3FF96B29E67B146A80, cn=SAGUNA GANESH THENGIL
Date: 2021.11.30 12:36:10 +05'30'

**( सगुणा काळे-ठेंगील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
५. अध्यक्ष, औद्योगिक न्यायालय, महाराष्ट्र, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, शासकीय वसाहत, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
६. महालेखापाल, (लेखापाल / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १ व २, मुंबई, नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. सह सचिव (कामगार), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. प्रबंधक, औद्योगिक न्यायालय, महाराष्ट्र, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, शासकीय वसाहत, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
११. संबंधीत कर्मचारी, (औद्योगिक न्यायालय महाराष्ट्र, मुंबई यांच्यामार्फत)
१२. निवड नस्ती, कामगार-६